**<u>राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रात मुलभुत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६८/नवि-१६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १५ सप्टेंबर, २०१५.**

**<u>वाचा :-</u>** (१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:- अविवि-२००९/प्र.क्र.४३/०९/का.१ दि.९ फेब्रुवारी,२००९.
(२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ- ३,दिनांक १७ एप्रिल,२०१५.

**<u>प्रस्तावना :-</u>**

अल्पसंख्याक विभागाने संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये "राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात मुलभुत नागरी सेवा उपलब्ध करुन देण्यासाठी क्षेत्र विकास कार्यक्रम राबविण्याबाबतचा" धोरणात्मक निर्णय घेतलेला आहे.राज्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगरपंचायती यांना त्याच्या कार्यक्षेत्रातील पायाभुत सोई सुविधांचा विकास करणेकरिता विविध योजनांतर्गत/योजनेत्तर सहाय्यक अनुदाने वितरीत करण्यात येतात. सदर निधी वितरणाची कार्यपध्दती विहीत करण्यात आलेली आहे. तथापि, "अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्र" या विशिष्ट प्रयोजनासाठी नगर विकास विभागामार्फत निधी वितरीत करण्यात येत नाही. "De-radicalization of youths and preserving communal amity" या विषयाबाबत मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत "अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात नागरी सुविधा पुरविणेबाबत" चा निर्णय घेण्यात आला

आहे. सबब, प्राथमिक टप्प्यात राज्यातील चार महानगरपालिका व एक नगरपरिषद यांना निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. या प्रयोजनाखाली महानगरपालिका/ नगरपरिषद अंतर्गत अल्पसंख्याक बहुल प्रभाग निश्चित करणे, सदर प्रभागांतर्गत विकास कामे निश्चित करणे व सदर कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत पुढील प्रमाणे समिती राहिल:-

(अ) महानगरपालिकेसाठी -

| | |
|---|---|
| विभागीय आयुक्त | - अध्यक्ष |
| जिल्हाधिकारी | - सदस्य |
| महानगरपालिका आयुक्त | - सदस्य सचिव |

(ब) नगरपरिषदेसाठी -

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| तहसिलदार | - सदस्य |
| मुख्याधिकारी | - सदस्य सचिव |

३. महानगरपालिका / नगरपरिषद क्षेत्रातील ज्या प्रभागामधील एकूण लोकसंख्याच्या किमान १०% लोकसंख्या अल्पसंख्याक (मुस्लिम, ख्रिश्चन, बौध्द, जैन, शीख, पारशी) समाजाची आहे अशा प्रभागाची निवड करण्यात यावी.

४. निश्चित केलेल्या प्रभागामध्ये कमतरता असणा-या पायाभुत सोई सुविधांचा प्राथम्य क्रम निश्चित करुन, उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेत प्रस्तावाला प्रशासकीय मान्यता देण्यात यावी.

५. या प्रयोजनाखाली सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षासाठी दोन टप्प्यात निधी उपलब्ध करून देण्यात येईल.

६. प्रथम टप्प्यात उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रक्कम रु.१,००,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी मात्र) पैकी ७५% उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतरच

दुस-या टप्प्याचे रक्कम रु.१,००,००,०००/- (अक्षरी रूपये एक कोटी मात्र) निधी वितरीत करण्यात येईल.

७. निश्चित करण्यात आलेल्या कामांना सक्षम प्राधिकरणाकडून आयुक्त/मुख्याधिकारी यांनी तांत्रिक मान्यता प्राप्त करून घ्यावी.

८. सदर प्रयोजनाकरिता उपलब्ध करून देण्यात आलेला निधी केवळ “अल्प संख्याक बहुल क्षेत्रात” वापरला जाईल व कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता संबधित आयुक्त/मुख्याधिकारी यांनी घ्यावी.

९. भिवंडी, मालेगांव, औरंगाबाद व सांगली-मिरज-कुपवाड या चार महानगरपालिका उपलब्ध करून द्यावयाची रक्कम रू. ८,००,००,०००/- (अक्षरी रूपये आठ कोटी मात्र) यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००)(०९) महानगरपालिका क्षेत्रात प्राथमिक सुखसोयींच्या विकासासाठी विशेष तरतूद (२२१७ ०९१३), ३१, सहाय्यक अनुदान, या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**१०.** कामठी नगरपरिषदेस उपलब्ध करून द्यावयाची रक्कम रू.२,००,००,०००/- (अक्षरी रूपये दोन कोटी मात्र) यासंबंधीचा खर्च मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (४२) नगरपरिषदांना वैशिष्ट्यपूर्ण कामासाठी विशेष अनुदान (वेतनेतर) (२२१७ १३०१), ३१, सहाय्यक अनुदान, या लेखाशिर्षाखाली सन २०१५-२०१६ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

**११.** उपरोक्त नमूद केल्यानुसार निधीचे वितरण करण्यासाठी संबधित जिल्हाधिकारी यांना नियंत्रक अधिकारी तसेच, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**१२.** सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक (२) अन्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागाच्या स्तरावरून निधी वितरीत करण्यास देण्यात आलेल्या अधिकाराच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**१३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१५१५२०४०४१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: CN = Vivek Shankar Kumbhar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = UNDER SECRETARY
Date: 2015.09.16 15:32:30 +05'30'

(विवेक कुंभार)

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई-३५
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. आयुक्त तथासंचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी, मुंबई-१८
८. सर्व विभागीय आयुक्त
९. उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय,मंत्रालय, मुंबई-३२

१०. जिल्हाधिकारी, ठाणे, नाशिक, औरंगाबाद, सांगली व नागपूर
११. मा.मंत्री (अल्पसंख्याक विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
१२. मा.मंत्री (वित्त व नियोजन विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२,
१३. मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
१४. आयुक्त, महानगरपालिका, भिवंडी, मालेगांव, औरंगाबाद व सांगली-मिरज-कुपवाड
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
१६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१९. मुख्याधिकारी नगरपरिषद, कामठी, जि.नागपूर
२०. लेखा अधिकारी (नवि-३१), नगरविकास विभाग
२१. अवर सचिव,(नवि-२३),नगरविकास विभाग
२२. कक्ष अधिकारी,(नवि-४),(नवि-१९),(नवि-२४),(नवि-२५),नगरविकास विभाग
२३. निवड नस्ती- नवि-१६